**गट विकास अधिकारी यांनी प्रत्येक महिन्याच्या पहिल्या शुक्रवारी घ्यावयाच्या बैठकीबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## ग्रामविकास विभाग

**शासन परिपत्रक क्रमांकः मविसे १०२०/प्र.क्र.४१/२०२०/आस्था-३**

बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ,
फोर्ट, मुंबई - ४०० ००१,
तारीख: ३ मार्च, २०२०

**शासन परिपत्रक-**

सर्वसामान्य लोकांच्या तक्रारींचे निराकरण करण्याच्या अनुषंगाने राज्यातील सर्व जिल्हयातील सर्व तालुक्यात लोकांच्या तक्रारी/गाऱ्हाणी/अडचणी सोडवणूक करण्यासाठी खालीलप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी.

१. प्रत्येक महिन्याच्या पहिल्या शुक्रवारी सकाळी ११.०० वाजता गट विकास अधिकारी यांनी त्यांच्या कार्यालयात तालुक्यातील लोकांच्या तक्रारी/गाऱ्हाणी/अडचणींची सोडवणूक करण्याकरिता सभा आयोजित करावी.

२. सदर सभेबाबत तालुक्यातील सर्व ग्रामपंचायतींना व गट विकास अधिकारी, पंचायत समिती यांचेकडे प्राप्त झालेल्या लेखी तक्रारीतील सर्व तक्रारदारांना सभेपूर्वी ८ दिवस आधी अवगत करावे.

३. उपरोक्त सभेमध्ये प्राप्त तक्रारींवर योग्य ती कार्यवाही करून, सदर दिवशी आलेल्या अर्जांची संख्या व त्यावर केलेली कार्यवाही याबाबतची लेखी स्वरूपात माहिती संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांना सादर करावी.

४. तद्नंतर मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी जिल्हयातील सर्व गट विकास अधिकारी यांच्याकडून प्राप्त माहिती संकलित करून संबंधित विभागीय आयुक्त यांच्याकडे सादर करावी.

५. सर्व विभागीय आयुक्त यांनी विभागातील सर्व जिल्हयांकडून प्राप्त माहितीचे संकलन करून

त्याचा गोषवारा महिन्याच्या शेवटच्या आठवडयात मा. मंत्री (ग्रामविकास) व अतिरिक्त मुख्य सचिव (ग्रामविकास व पंचायत राज) यांच्या कार्यालयास सादर करावा.

६. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३०२१७४२२७३९२० असा आहे. हा परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PANDIT KAHANDERAO JADHAV

Digitally signed by PANDIT KAHANDERAO JADHAV
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=130c3faa5ebf138c8b39058785ac534c17d9b377a1b84b0b4d591d63ea56da06, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=f5c40942371a6969108d4d7e802129ea5f7a19f482726930e17fe1f06ad5cc76, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=PANDIT KAHANDERAO JADHAV
Date: 2020.03.03 12:29:12 +05'30'

**(पं. खं. जाधव)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा. मंत्री (ग्रामविकास), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
२. अतिरिक्त मुख्य सचिव (ग्रामविकास व पंचायत राज) यांचे स्वीय सहायक, बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ, फोर्ट, मुंबई - ४०० ००१,
३. विभागीय आयुक्त, कोकण, नाशिक, पुणे, नागपूर, अमरावती व औरंगाबाद,
४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,सर्व,
५. गट विकास अधिकारी, पंचायत समिती, सर्व,
६. निवड नस्ती, (का.क्र.आस्था-३), ग्राम विकास विभाग.